

# महाराष्ट्र शासन

क्रमांक:-गौखनि-३६/०६१९/प्र.क्र.८८/ख-१

महसूल व वन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ डिसेंबर, २०२१.

<u>विषय:-गौण खनिज- सांगली</u>
सन २०१६-२०१७ करीता मौजे कासेगांव, ता.वाळवा या वाळूगटातून उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम परत करणेबाबत.
श्री.अविनाश मधुकर खरात

<u>शासन ज्ञापन :-</u>

जिल्हाधिकारी, सांगली यांना त्यांचे पत्र क्र.मह/३/खनिज/आरआर/११८९/२०१७, दि.१६/१०/२०१७ व क्र.मह/३/खनिज/आरआर/६३६/२०२१, दि.८/४/२०२१ रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१६-२०१७ या वर्षाकरीता दि.८/११/२०१६ रोजी घेण्यात आलेल्या लिलावात मौजे कासेगांव (गट नं.१७३६ ते १८२३), ता. वाळवा हा वाळूगट श्री.अविनाश मधुकर खरात यांना ४०८४ ब्रास वाळू परिमाणाकरीता रू.३,००,१९,३६०/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला. लिलावधारकाने लिलावाची संपूर्ण रक्कम शासनजमा केल्यानंतर लिलावधारकासोबत झालेल्या करारनाम्यानुसार उक्त वाळूगटाचा ताबा मंडळ अधिकारी, कासेगांव व तलाठी कासेगाव यांनी लिलावधारक यांना दि.०५/०२/२०१७ रोजी दिला.

०२. तथापि, मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण, नवी दिल्ली यांचे दि.१९/४/२०१७ रोजीच्या आदेशानुसार दि.२१/०४/२०१७ रोजीच्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार नदीपात्रातील वाळू/ रेती गटातून सक्शन पंपाद्वारे होणारे वाळू उत्खनन बंद करण्यात आले. त्यामुळे लिलावधारकास वाळूचे उत्खनन करता आले नाही.

०३. सबब, मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण, नवी दिल्ली येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.३६३/२०१५ व ३६६/२०१५ ते ३६८/२०१५ मधील दि.१९/४/२०१७ चे आदेशाच्या अनुषंगाने लिलावधारकास उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रुपये २,१०,९५,८४८/- (रुपये दोन कोटी दहा लाख पंचाण्णव हजार आठशे अठ्ठेचाळीस फक्त) इतकी लिलावधारकास परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०४. लिलावधारक श्री श्री.अविनाश मधुकर खरात यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रुपये २,१०,९५,८४८/- (रुपये दोन कोटी दहा लाख पंचाण्णव हजार आठशे अठ्ठेचाळीस फक्त) अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

०५. या बाबीवर होणारा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०६. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २११/२०२१/व्यय-०९, दि.२९ जुलै,२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२११२१७१५०५५०६११९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2021.12.17 15:07:35 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी,सांगली

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४, साधनसंपत्ती कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन “ख”), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.